नॅशनल स्टॉक एक्सचेंज यांच्या सहाय्याने शासकीय आश्रमशाळामध्ये वॉश सुविधा उपलब्ध करून देणे, शिक्षक व विद्यार्थ्यांचे प्रशिक्षण व क्षमता वृध्दि करणे.

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय, क्रमांक-शाआशा-२०१७/प्र.क्र.१२४ / का. १३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक - १९ ऑगस्ट,२०१७.

## शासन निर्णय

शासकीय आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांमध्ये स्वच्छतेच्या सवयी लावणे, त्यांच्या मध्यमातून आदिवासी भागातील गावांमध्ये स्वच्छतेचा प्रचार व प्रसार करणे आाणि आरोग्यमान उंचावणे या उद्देशाने सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षापासून शासकीय आश्रमशाळांमध्ये वॉश कार्यक्रम राबविण्याचा निर्णण शासनाने दि. ११ मार्च २०१५ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. सदर कार्यक्रमाचा एक भाग म्हणून नॅशनल स्टॉक एक्सचेंज यांचे मार्फत सीएसआर अंतर्गत राज्यातील आदिवासी विकास विभागांमतर्गतच्या १७२ शासकीय आश्रमशाळांमध्ये वॉश सुविधांची पुर्तता होण्यासाठी पाणीपुरवठा व्यवस्था, स्नानगृहे, शौचालये, मुतारी हॅडवाश स्टेशन, कपडे धुण्याची जागा यांची दुरुस्ती व देखाभाल, सॅनेटरी नॅपकीनची विल्हेवाट व्यवस्था,विद्यार्थी व शिक्षक यांचे प्रशिक्ष्ण, व्यवस्थासन व देखभाल करणाऱ्या कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण इत्यादी वरील खर्च करण्यात येणार आहे. मात्र सदर निवडलेल्या आश्रमशाळामधील पाणीपुरवठा, स्नानगृहे, शौचालये, मुतारी, हॅडवाश स्टेशन, कपडे धुण्याची जागा याची कमतरता तसेच असल्यास त्यांच्या आवश्यकतेप्रमाणे नविन बांधकाम करावयास लागल्यास त्यावरील खर्च आदिवासी विकास विभागास करावा लागणार आहे. याबाबतचा सामंजस्य् करार नॅशनल स्टॉक एक्सचेंज व आदिवासी विकास विभाग यांच्यामध्ये दि.०५जून, २०१७ रोजी करण्यात आलेला आहे.

२. सदरचा कार्यक्रम तीन वर्षांमध्ये राबविण्यात येणार असून त्यामध्ये प्रथम टप्प्यात अपर आयुक्त नाशिक अंतर्गतच्या ६० ते ७० आश्रमशाळा त्यानंतर दुसऱ्या टप्प्यामध्ये अपर आयुक्त्, ठाणे अंतर्गतच्या ६० शाळांमध्ये व त्यानंतर दोन्ही पक्षांच्या परस्पर सहकार्याने निवडलेल्या ठिकाणच्या आश्रमशाळांमध्ये तीसऱ्या टप्प्यात उर्वरीत शाळांची निवड करण्यात येणार आहे. सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणी व सवन्व्यासाठी नॅशनल स्टॉक एक्सचेंज यांचे मार्फत प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेची निवड करण्यात येणार आहे. या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी आयुक्त स्तरावर प्रकल्प समन्वय समिती व कार्यक्रमाच्या अंमलबजावणीचा आढावा घेण्यासाठी सचिव, आदिवासी विकास यांच्या अध्यक्षतेखाली सुकाणू समिती यांची स्थापना करण्यात येणार आहे.

३. सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणी मध्ये नॅशनल स्टॉक एक्सचेंज यांच्या भूमिका जबाबदारी व कर्तव्य खालीलप्रमाणे राहतील:-

(१) निवडलेल्या १७२ आश्रमशाळांमधील वॉश पुर्ततेसंदर्भात त्रयस्थ् संस्थेमार्फत करण्यात आलेल्या मूल्यमापन अहवालानुसार संबंधीत आश्रमशाळांमध्ये शौचालये, मुतारी, सामूहिक हॅडवॉश स्टेशन, पिण्याच्या पाण्याच्या वितरण यामध्ये वाढ करणे व दुरूस्ती करणे, पिण्याची पाण्याची गुणवत्ता सुधारणे, जल निस्सारण व घन कचरा व्यवस्थापन, कपडे धुण्याचे जागा तयार करणे, नॅपकीनची विल्हेवाट व्यवस्था इत्यादी व्यवस्था करणे तसेच स्वयंपाकातील उरलेल्या कचऱ्याचे व्यवस्थापन ,अन्न् हाताळणी व आरोग्य, विद्यार्थ्यी व शिक्षक यांच्यामध्ये कौशल्यवृद्धी व प्रशिक्षण यावरील रु. ९.७० कोटी इतका खर्च नॅशनल स्टॉक एक्सचेंज मार्फत करण्यात येईल.

(२) सदर कार्यक्रमाची दैनंदिन अंमलबजावणी, पर्यवेक्षण व नियंत्रण करण्यासाठी संबंधीत प्रकल्प् क्षेत्रात कार्यरत असलेल्या प्रकल्प् व्यवस्थापन सल्लागार संस्थेची निवड करण्यात येईल. सदर प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेमार्फत वॉश कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी १० ते १५ आश्रमशाळांसाठी एक याप्रमाणे कामाच्या अंमलबजावणीसाठी अशासकीय संस्था किंवा मुख्य संसाधन केंद्र यांची नियुक्ती करण्यात येईल.

(३) प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्था ही नॅशनल स्टॉक एक्सचेंजची नोडल एजेंसी म्हणून काम करेल. तसेच ती स्थानिक स्तरावर अन्य भागीदार यांची नियुक्ती करणे, कार्यक्रमाच्या अंमलबजावणी, प्रशिक्षण, दळणवळण, तांत्रिक अहवाल तयार करणे, संनियंत्रण व मूल्यमापन करण्यासाठी जबाबदार असेल.

(४) नॅशनल स्टॉक एक्सचेंज यांच्या कडून प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेच्या सहायाने वेळोवळी अंमलबजावणीचा आढावा घेवून त्यावर सूकाणू समितीच्या त्रैमासिक बैठकीत चर्चा करण्यात येईल.

(५) नॅशनल स्टॉक एक्सचेंज यांच्या मार्फत सचिव, आदिवासी विकास विभाग यांच्याकडे थेट समन्वय साधण्यात यईल, यासाठी अन्यसंस्थेची नियुक्ती करण्यात येणार नाही.

(६) सदर कार्यक्रमाच्या संबंधीत जिल्ह्यातील आवश्यकतेप्रमाणे दैनंदिन अंमलबजावणीसाठी प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेमार्फत आयुक्तालयास समन्वय साधण्यात येईल.

(७) नॅशनल स्टॉक एक्सचेंज मार्फत शौचालय, मुतारी, पिण्याच्या पाणीपुरवठ्याची जोडणी यामध्ये वाढ व नुतनीकरण करण्यासाठी मदतकरण्यात येईल.

(८) नॅशनल स्टॉक एक्सचेंज मार्फत नविन सामूहिक हँडवॉश स्टेशन तयार करणे, इन्सीनेटर बसविणे, पिण्याचे पाणीपुरवठ्याची जोडणी करणे यासाठी मदत करण्यात येईल.

(९) नॅशनल स्टॉक एक्सचेंज मार्फत वर्तणूक बदल व कौशल्य वृध्दी यासाठी मदत करण्यात येईल.

(१०) नॅशनल स्टॉक एक्सचेंज मार्फत सामंजस्य कराराच्या कालावधीत वरील शाळांमध्ये देखभाल व दुरुस्तीवरील खर्च करण्यात यईल.

४. सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणी मध्ये आदिवासी विकास विभाग यांची भूमिका, जबाबदारी व कर्तव्ये खालीलप्रमाणे राहतील:-

(१) आदिवासी विकास विभागाकडून कार्यक्रमाच्या अंमलबजावणी संदर्भात धोरण निश्चित करून त्याच्या अंमलबजावणी संदर्भात आणि सर्व स्तरावर प्रशासकीय स्तरावरील सहकार्यासाठी वेळोवेळी आदेश/परिपत्रक निर्गमित करण्यात येतील. तसेच वॉश कक्षांमार्फत तांत्रिक सहाय्य करण्यात येईल.

(२) सविस्तर प्रकल्प आराखड्यानुसार जेथे आश्रमशाळेमध्ये वॉश पुर्तता करण्यासाठी नविन सुविधा निर्माण करणे (पिण्याच्या पाण्याची उपलब्धता, स्वच्छता व आंघोळीसाठी पाणीपुरवठा, स्वच्छता सुविधा, सामूहिक हँडवॉश स्टेशन) यावरील खर्च आदिवासी विकास विभागामार्फत करण्यात येईल. मात्र सदरची कामे नॅशनल स्टॉक एक्सचेंज मार्फत करण्यात येतील.सदर कामांसाठी जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गतच्या शासकीय आश्रमशाळांची दुरूस्ती या योजनेच्या तरतुदीमधून भागविण्यात येईल.

(३) आदिवासी विकास विभागकडून मंत्रालयीन स्तरावर सुकाणू समिती व आयुक्तालय स्तरावर समन्वय समितीची स्थापना करण्यात येईल व त्यांच्या मार्फत निश्चित केलेल्या कालावधीत आढावा घेण्यात येईल.

(४) प्रकल्प अंमलबजावणीच्या सहमतीनंतर शाळास्तरावरील प्रत्यक्ष अंमलबजावणीच्या वेळी आलेल्या प्रतिसादानुसार त्यामध्ये सुधारणा करण्यात येईल.

(५) आदिवासी विकास विभागाकडून अपर आयुक्त कार्यालय, प्रकल्प कार्यालय, अन्यसंबंधीत विभाग किंवा कार्यालय किंवा कर्मचारी यांना यासंदर्भात आवश्यक सहकार्य व संनियंत्रण करण्यासाठी सुचना देण्यात येतील.

(६) आदिवासी विकास विभागाकडून नॅशनल स्टॉक एक्सचेंज मार्फत निवडण्यात येणाऱ्या अंमलबजावणी यंत्रणेस सहकार्य करण्यात येईल तसेच त्यांना निवडलेल्या आश्रमशाळांची यादी देण्यात येईल.

(७) नॅशनल स्टॉक एक्सचेंज मार्फत वॉश कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी निवडकरतांना वर्ष भरासाठी पुरेल इतका पुरेसा पाणीपुरवठा, स्वतःच्या इमारतीत असलेल्या, समायोजनामध्ये स्थलांतर प्रस्तावीत नसलेल्या व सदर आश्रमशाळांमध्ये सुलभ अंमलबजावणीसाठी आवश्यक असलेल्या वरिष्ठ कर्मचाऱ्यांची उपलब्धता या बाबीं विचारात घेण्यात येतील.

(८) आयुक्तलायामार्फत सदर कार्यक्रमासाठी प्रत्यक्ष भेट देवून मासिक आढावा घेणे, कामांची सुलभपणे अंमलबजावणी करणे, इत्यादी संदर्भात प्रकल्प् अधिकारी व मुख्याध्याप यांना वेळोवेळी विशिष्ठ् सुचना देण्यात येतील. याबाबत आदिवासी विकास विभागाकडून खात्री करण्यात येईल.

(९) नॅशनल स्टॉक एक्सचेंज मार्फत वॉश कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी केलेला खर्च व उपलब्ध करून दिलले मानव संसाधन यांचा विचार करता आदिवासी विकास विभागाने सदर कार्यक्रमाचे व्यवस्थापन व देखभाल कायमस्वरूपी राहिल याची खातरजमा करावी तसेच या कार्यक्रमाअंतर्गत निवडलेल्या प्रत्येक आश्रमशाळेत वॉश ची पूर्तता झाल्याची खातरजमा त्रयस्थ संस्थेमार्फत तपासणी करुन करावी.

५. सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीच्या समन्वय व आढाव्यासाठी खालील प्रमाणे समित्यांची स्थापना करण्यात येईलः-

अ**) प्रकल्प समन्वय समिती:**- कार्यक्रमाचे प्रकल्प स्तरावरील अंमलबजावणीचे समन्वय करून संनियत्रण व मार्गदर्शन करण्यासाठी या समितीची स्थापना करण्यात येईल. समितीची रचना खालील प्रमाणे असेलः-

| | |
|---|---|
| १) आयुक्त, आदिवासी विकास | अध्यक्ष |
| २) संबंधीत अपर आयुक्त, | सदस्य सचिव |
| ३) संबंधीत प्रकल्प् अधिकारी | सदस्य |
| ४) नॅशनल स्टॉक एक्सचेंज | सदस्य |
| ५) प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्था | सदस्य |
| ६) बांधकाम व्यवस्थापन कक्ष प्रतिनिधी | सदस्य |
| ७) युनिसेफ चे प्रतिनिधी | सदस्य |

सदर समितीची बैठक प्रत्येक महिन्यास किंवा परस्पर सहमतीने निश्चित केलेल्या दिनांकास आयोजित करण्यात येईल

**सदर समितीचे कार्ये खालीलप्रमाणे असतील:-**

१) सदर कार्यक्रमाचे स्थानिक स्तरावरील धेय व धोरणे निश्चित करणे.
२) प्रकल्पाच्या अंमलबजावणीचा आढावा घेणे.
३) प्रकल्पाच्या अंमलबजावणीच्या अडचणीचा आढावा घेणे.
४) प्रकल्पाच्या सुलभ अंमलबजावणीतील संदर्भात सल्ला व सूचना करणे.
५) स्थानिक स्तरावर नागरी कामे आणि अंदाजपत्रका संदर्भात सल्ला/मदत करणे.
६) कार्यक्रमाच्या कालबद्ध प्रगतीचा आढावा घेणे.

**ब) सुकाणू समिती :-** सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीची व्यूहरचना ठरविण्यासाठी या समितीची स्थापना करण्यात येईल. सदर समितीची रचना खालील प्रमाणे असेलः-

| | |
|---|---|
| १) सचिव, आदिवासी विकास | अध्यक्ष |
| २) आयुक्त्, आदिवासी विकास | सदस्य सचिव |
| ३) संबंधीत अपर आयुक्त, | सदस्य |

| | |
|---|---|
| ४) संबंधीत प्रकल्प अधिकारी | सदस्य |
| ५) नॅशनल स्टॉक एक्सचेंज | सदस्य |
| ६) प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्था | सदस्य |
| ७) युनिसेफ चे प्रतिनिधी | सदस्य |
| ८) दोन्ही बाजूच्या सहमतीनूसार निमंत्रीत | सदस्य |

सदर समितीची बैठक प्रत्येक तीमाहिस किंवा परस्पर सहमतीने निश्चित केलेल्या दिनांकास आयोजित करण्यात येईल.

**सदर समितीचे कार्ये खालीलप्रमाणे असतील:-**

१) सदर कार्यक्रमाचे दीर्घकालीन धेय व धोरणे निश्चित करणे.
२) प्रकल्पाच्या अंमलबजावणीची निष्पत्ती व सफलता यांचा आढावा घेणे.
३) सदर कार्यक्रमातील सहकार्य व दोन्ही पक्षाव्यतीरीक्त याची व्याप्ती वाढविण्यासंदर्भात आढावा घेणे.
४) पुढील कामांसाठी कालबध्द कार्यक्रम निश्चित करणे
५) मुलभूत सुविधांच्या किमान गरजांच्या निकषाचा आढावा व त्यासाठी विभागाने निश्चित केलेल्या तरतूदीचा आढावा घेणे.
६) सदर कार्यक्रम नविन असल्याने दोन्ही बाजूनी सामंजस्य दाखवणे व परस्पसरामध्ये सहकार्याची भावना ठेवून पुढील वाटचालीची दिशा ठरविणे.
७) दोन्ही बाजुंच्या सहमती नंतर अशाच कार्यक्रमासाठी इच्छुक असलेल्या अन्य भागीदाराचे सहाय्य घेणे.

८. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन दिला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०८२३१५५६३३१९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2017.08.23 15:46:13 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.
३. मा.मंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई :- ४०० ०३२.
४. सर्व मा. मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.

६. सर्व मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. सर्व मा. विधानसभा सदस्य.
८. सर्व मा. विधानपरिषद सदस्य.
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. मा. सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. मा. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१४. सर्व जिल्हाधिकारी.
१५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक
१६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर / नाशिक/ ठाणे / अमरावती.
१७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१८. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१९. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२२. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२३. सर्व उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
२४. उप सचिव (व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. सर्व मुख्याध्यापक, शासकिय आश्रमशाळा
२६. निवडनस्ती (का-१३) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबईः- ४०० ०३२.